सन २०२४-२५ या वर्षामधील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत National Rural Economic Transformation Project (NRETP) योजनेकरीता अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासननिर्णयक्रमांकः उमेद-२०२४/प्र.क्र.५०/योजना-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १८ जुलै, २०२४

वाचा :-

१. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एस-११०५७/०६/२०१८-एसव्हीईपी (३६४८८७), दिनांक २० ऑगस्ट, २०१९.
२. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/०१/२०२४-आरएल (एनआरईटीपी_०१), दिनांक २१ जून, २०२४.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, एसएसआरएलएम, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/८३४/२०२४, दिनांक २१ जून, २०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प (NRETP) या योजनेकरिता संदर्भाधीन क्र.२ अन्वये पहिल्या हप्त्याचा पहिला टप्पा म्हणून रु.४०,१२,३७,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प (NRETP) योजनेकरीता केंद्र हिस्सा (२५०१ ए१९१) याकरिता रु.८८,३६,२६,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. तसेच राज्य हिस्सा (२५०१ ए२०८) याकरिता रु.५८,९०,८४,०००/- इतकी तरतूद इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. आता उपरोक्त केंद्र हिस्सा रु.४०,१२,३७,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.२६,७४,९१,३३३/- असा एकूण रु.६६,८७,२८,३३३/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प {National Rural Economic Transformation Project (NRETP)} केंद्र हिस्सा (२५०१ ए१९१) याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.४०,१२,३७,०००/- (अक्षरी रुपये चाळीस कोटी बारा लाख सदोतीस हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ ए२०८) याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून

रु.२६,७४,९१,३३३/- (अक्षरी रुपये सव्वीस कोटी चौऱ्याहत्तर लाख एक्याण्णव हजार तीनशे तेहतीस फक्त) असा एकूण रु.६६,८७,२८,३३३/- (अक्षरी रुपये सहासष्ट कोटी सत्याऐंशी लाख अठ्ठावीस हजार तीनशे तेहतीस फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.४०,१२,३७,०००/- (अक्षरी रुपये चाळीस कोटी बारा लाख सदोतीस हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०२, राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान, (००) (००)(०१) राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प ग्रामीण भागातील उद्योगांना आर्थिक विकसित करणे (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ए१९१)" या लेखाशिर्षाखाली व रु.२६,७४,९१,३३३/- (अक्षरी रुपये सव्वीस कोटी चौऱ्याहत्तर लाख एक्याण्णव हजार तीनशे तेहतीस फक्त) चा खर्च “मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०२, राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान, (००) (००)(०२) राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प ग्रामीण भागातील उद्योगांना आर्थिक विकसित करणे (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ए२०८)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. राष्ट्रीय ग्रामीण आर्थिक परिवर्तन प्रकल्प (NRETP) ही योजना केंद्र पुरस्कृत असल्याने, या शासन निर्णयाव्दारे वितरीत होणारा निधी संबंधित योजनेच्या Single Nodal Agency (SNA) खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र, ४) या योजनेची प्रगती / सद्य:स्थिती दर ४ महिन्यांनी शासनास कळविण्यात यावी. ५) कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार

नाही याची संबंधीत अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी, अन्यथा त्यांच्यावर शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक्र दिनांक ०१ एप्रिल, २०२४ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.४६४/२०२४/व्यय-१५ दिनांक ०५.०७.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१६१७३९३०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK ASHOK DAINGADE

Digitally signed by VIVEK ASHOK DAINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=53c2fccec74ddb1c052589e5cbaed9d19ba0d0043df169c83be27faeb8bf045b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=670EB0FA576F65F4406D031E11A90EA6FFB3AEFB253D401F5CED2AD1A6605DBF, cn=VIVEK ASHOK DAINGADE
Date: 2024.07.18 17:09:20 +05'30'

**( विवेक दाईंगडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (१४१४), मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्तविभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवड नस्ती.